नगर रचनाकार (गट-अ / राजपत्रित) या तांत्रिक संवर्गातील अधिकाऱ्यांच्या पदोन्नतीने / बदलीने पदस्थापना करण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग,**
**शासन निर्णय क्र.पदोन्न-५८१६/११७५/प्र.क्र.२२८/२०१६/नवि-२७,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
चौथा मजला, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
**दिनांक :- ३१ मार्च, २०१७.**

वाचा :- नगर विकास विभाग शासन निर्णय, क्र.पदोन्न-५८१६/११७५/प्र.क्र.२२८/२०१६/नवि-२७, दिनांक ३०.१२.२०१६.

**प्रस्तावना :-**

नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालयाच्या आस्थापनेवरील पदविकाधारक सहाय्यक नगर रचनाकार, श्रेणी-२ (गट-ब / राजपत्रित) संवर्गातील अधिकाऱ्यांना नगर रचनाकार (गट-अ / राजपत्रित) (वेतनसंरचना पीबी-३ रु.१५६००-३९१००+ग्रेड पे रु.५४००) पदावर संदर्भाधिन शासन निर्णयान्वये पदोन्नतीने पदस्थापना देण्यात आलेल्या आहेत. त्यानुसार श्री. स. ध. वाणी यांना नगर रचनाकार, धुळे शाखा, धुळे येथे तर श्री. मो. बा. मंडवाले यांना सहायक संचालक, नगर रचना, सातारा शाखा, सातारा येथे पदस्थापना देण्यात आली आहे. तथापि, श्री. स. ध. वाणी यांनी त्यांच्या मुलाच्या गंभीर आजारास्तव तर श्री. मो. बा. मंडवाले यांनी त्यांच्या कौटुंबिक व वैद्यकीय कारणास्तव पदस्थापना बदलून मिळणेची विनंती केलेली आहे. श्री. स. ध. वाणी हे नगर रचनाकार, धुळे शाखा, धुळे पदावर दि.३१.१२.२०१६ (म.पू.) रोजी हजर झाले आहेत. तथापि, श्री. मो. बा. मंडवाले हे वैद्यकीय कारणास्तव दि.२९.१२.२०१६ पासून रजेवर असल्याने सहायक संचालक, नगर रचना, सातारा शाखा, सातारा येथे रुजू झालेल नाहीत. या बाबी विचारात घेता, नगर रचनाकार संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदलीने / पदोन्नतीने पदस्थापनेबाबत पुढीलप्रमाणे आदेश देण्यात येत आहेत :-

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४ (४) (दोन) व कलम ४ (५) मधील तरतुदींनुसार / प्रशासकीय कारणास्तव नगर रचनाकार (गट-अ / राजपत्रित) तांत्रिक संवर्गातील खालील अधिकाऱ्यांना पुढील विवरणपत्रात दर्शविल्यानुसार बदलीने पदस्थापना देण्यात येत आहेत.:-

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नाव | सध्या कार्यरत असलेले कार्यालय | बदली / पदोन्नतीने पदस्थापनेचे कार्यालय | शेरा |
|---|---|---|---|---|
| १ | श्री. मोहनसिंह बाबुराव मंडवाले | (दि.२९.१२.२०१६ पासून वैद्यकीय रजेवर) | भूमि संपादन विशेष अधिकारी, विशेष घटक, सोलापूर. (रिक्त पदी) | वैद्यकीय कारणास्तव स्वविनंतीनुसार. |
| २ | श्री. सतीश धर्मराज वाणी | नगर रचनाकार, धुळे शाखा, धुळे. | भूमि संपादन विशेष अधिकारी, विशेष घटक,क्र.१,पिंपरी,पुणे-१८. (श्री. मि. गु. आवडे यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या पदावर) | वैद्यकीय कारणास्तव स्वविनंतीनुसार. |
| ३ | श्री. मिलिंद गुलाब आवडे | भूमि संपादन विशेष अधिकारी, विशेष घटक,क्र.१, पिंपरी, पुणे-१८. | सहायक संचालक, नगर रचना, सातारा शाखा, सातारा. (रिक्त पदी) | प्रशासकीय कारणास्तव |

**०२.** श्री. मो. बा. मंडवाले यांना नगर रचनाकार पदावरील पदोन्नतीने सुधारित पदस्थापना देण्यात येत असल्याने ते ज्या दिनांकास सुधारित पदस्थापनेच्या पदावर रुजू होतील, त्या दिनांकापासून ते पदोन्नत झाल्याचे समजण्यात येईल. श्री. मो. बा. मंडवाले हे दि.२९.१२.२०१६ पासून वैद्यकीय कारणास्तव रजेवर असल्याने त्यांनी वैद्यकीय रजेवरुन परत आल्यावर पदोन्नतीच्या ठिकाणी रुजू व्हावे.

**०३.** श्री. मि. गु. आवडे, नगर रचनकार, भूमि संपादन विशेष अधिकारी, विशेष घटक, पिंपरी, पुणे-१८ यांची सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय सोयीच्यादृष्टीने बदलीने पदस्थापना करण्यात येत असल्याने त्यांना नियमानुसार अनुज्ञेय पदग्रहण अवधी व संयुक्त बदली अनुदान मंजूर करण्यात यावे.

**०४.** संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी वरील अधिकाऱ्यांना बदलीने / पदोन्नतीने पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू होण्याकरिता आवश्यक ते कार्यकारी आदेश तातडीने निर्गमित करावेत. तद्नंतर संबंधित अधिकाऱ्यांनी संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे कार्यकारी आदेश प्राप्त होताच पदस्थापनेच्या ठिकाणी तातडीने रुजू व्हावे.

**०५.** सदरहू आदेशान्वये बदली करण्यात आलेल्या अधिकाऱ्यांनी नियुक्तीच्या ठिकाणी हजर न झाल्यास वा राजकीय दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न केल्यास त्याची संबंधित अधिकाऱ्यांच्या गोपनीय अहवालात नोंद घेण्यात येईल. तसेच राजकीय दबावाबाबतची कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम ३ (३) व २३ चे उल्लंघन करणारी असल्यामुळे ती गैरवर्तणूक समजून संबंधितांविरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, याची नोंद घेण्यात यावी.

**०६.** संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी, सदर बदल्यांच्या अनुषंगाने रिक्त होणाऱ्या पदाचा अतिरिक्त कार्यभार त्याच अथवा नजिकच्या कार्यालयातील समकक्ष दर्जाच्या अधिकाऱ्यांकडे अथवा बदली होणाऱ्या अधिकाऱ्याच्या संवर्गास कनिष्ठ असलेल्या संवर्गामधील त्याच कार्यालयातील ज्येष्ठ अधिकाऱ्याकडे सोपविण्यात यावा. परंतू, कोणत्याही परिस्थितीत बदली होणाऱ्या अधिकाऱ्याकडे त्याच्या बदलीमुळे रिक्त होणाऱ्या पदाचा अतिरिक्त कार्यभार सोपविला जाणार नाही, याची दक्षता घ्यावी.

**०७.** सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक **२०१७०३३११६०९१०६४२५** असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Eknath Kisan Sahane

Digitally signed by Eknath Kisan Sahane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c2f7e29994246b598ed0f72234360bb639afd8fae26e0e7238d80dcb921ce52a, cn=Eknath Kisan Sahane
Date: 2017.04.13 13:01:08 +05'30'

**( ए. कि. सहाणे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

सर्व संबंधित अधिकारी -----------------------------------------------यांना,
(संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्यामार्फत.)

**प्रत :-**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
३. महालेखापाल (लेखा परिक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
४. महालेखापाल (लेखा परिक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.
५. मा. मुख्य मंत्र्याचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-४११ ००१. **(३-प्रती)**
७. सह संचालक, नगर रचना, नाशिक विभाग, नाशिक / पुणे विभाग, पुणे.
८. सहायक संचालक, नगर रचना, सातारा शाखा, सातारा.
९. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१०. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, नागपूर.
११. सर्व संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी---------------------,
१२. नगर रचनाकार, धुळे शाखा, धुळे.
१३. भूमि संपादन विशेष अधिकारी, विशेष घटक, पिंपरी, पुणे-१८.
१४. मा. प्रधान सचिव (नवि-१) यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. निवडनस्ती / नवि-२७.

*****